ई-लिलाव झालेल्या प्रमुख खनिजाच्या खाणक्षेत्राना आवश्यक परवानग्या प्राप्त होऊन खाणक्षेत्र विहित कालमर्यादेत कार्यान्वीत करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत......

# महाराष्ट्र शासन

**उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन निर्णय क्र.एमएनजी-०४२५/प्र.क्र.४१/उद्योग-९अ**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई

दिनांक : ०९ मे, २०२५

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यातील प्रमुख खनिजाच्या ई-लिलाव झालेल्या खनिज क्षेत्रातून लवकरात लवकर खनिज उत्खनन व वाहतूक सुरु होण्याच्या दृष्टीने, अशा खाणक्षेत्रांना संबंधीत विभागाकडून आवश्यक असलेल्या सर्व परवानग्या विहित वेळेत प्राप्त करुन घेणे, या परवानग्या घेत असताना, संबंधीत सर्वोच्च बोलीधारकास येणाऱ्या अडचणी, त्यांना मार्गदर्शन करणे, परवानग्या प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत विभागाकडे पाठपुरावा करणे, इ. उद्दिष्टास अनुलक्षून खाणक्षेत्रासाठी ज्या-ज्या विभागाच्या परवानग्या आवश्यक असतात, अशा प्रकरणांचा आढावा घेण्यासाठी, संबंधीत सर्व विभागाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचा समावेश असलेली एक समिती महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय यांचे अध्यक्षतेखाली, स्थापन करण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०८/०३/२०२५ रोजी, मुंबई येथे संपन्न झालेल्या बैठकीत निर्णय झालेला आहे. त्यानुसार, खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील खाणक्षेत्राचे विहित कालावधीत कार्यान्वयन होण्यासाठी आवश्यक परवानग्या / मंजूरी प्राप्त होण्यासाठी विविध प्रशासकीय विभाग व खाणक्षेत्रधारकाकडे पाठपुरावा करणे, आवश्यक परवानग्या शिर्घ गतीने प्राप्त होण्यासाठी आदर्श कार्यान्वयन पध्दती तयार करणे तसेच खाणपट्टयांच्या शिघ्र कार्यान्वयासाठी Pre-embedded अनुमतीची कार्यपध्दती विहित करण्यासाठी खालील प्रमाणे समिती स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**समितीची रचना :-**

| अ.क्र. | विभागाच्या अधिकाऱ्याचे पदनाम | विभागाचे नाव | समिती पदनाम |
|---|---|---|---|
| १ | महासंचालक, | भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर | अध्यक्ष |
| २ | नोडल अधिकारी किंवा त्यांचे प्रतिनिधी | वन विभाग | सदस्य |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | पर्यावरण विभागाचे नामनिर्देशित अधिकारी किंवा त्यांचे प्रतिनिधी | पर्यावरण विभाग | सदस्य |
| ४ | जलसंपदा विभागाचे नामनिर्देशीत अधिकारी अथवा संबंधित जिल्हा अधिक्षक अभियंता, | जलसंपदा विभाग | सदस्य |
| ५ | संबंधित जिल्ह्यातील सह जिल्हा निबंधक (वर्ग-१) तथा मुद्रांक जिल्हाधिकारी | संबंधित जिल्हा (महसूल विभाग) | सदस्य |
| ६ | संबंधित जिल्ह्यातील जिल्हा भूमि अभिलेख अधिकारी, | भूमि अभिलेख (महसूल विभाग) | सदस्य |
| ७ | मदत व पुनर्वसन विभागाचे नामनिर्देशित अधिकारी अथवा संबंधीत जिल्ह्यातील उपजिल्हाधिकारी | मदत व पुनर्वसन विभाग | सदस्य |
| ८ | संबंधित जिल्ह्यातील जिल्हा खनिकर्म अधिकारी | भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर | सदस्य |
| ९ | संचालक | भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१. या समितीने मंजूर खाणपट्टे शीघ्र गतीने सुरु होण्याकरिता सर्व संबंधित विभागांची अनुमती/ मंजुरी शीघ्र गतीने प्राप्त होण्यासाठी, आदर्श कार्यान्वयन पध्दती (Standard Operating Practice) तात्काळ तयार करावी.

२. सर्वोच्च बोलीधारक घोषित झाल्यापासून ते मायनिंग लिज देईपर्यंतचे सर्व टप्पे व परवानग्या या एक खिडकी प्रणालीतून देता येईल तसेच खाणपट्टयाच्या विविध परवानग्याची सद्य:स्थितीसुध्दा त्या प्रणालीमध्ये उपलब्ध होईल, अशी प्रणाली विकसित करावी.

३. खाणपट्टयाचे कार्यान्वयन कालावधी कमी होण्याच्या दृष्टीने, खाणपट्टाधारकांना Pre-embedded अनुमती देता येईल किंवा कसे याचाही, संबंधित सर्व विभागाशी विचारविनिमय करुन प्रारुप कार्यपध्दतीचा अहवाल शासनास सादर करावा.

४. खाणपट्टाधारकास, लवकरात लवकर आवश्यक सर्व परवानग्या (वन/पर्यावरण व इतर अनुषंगीक परवानग्या) मिळाव्यात यासाठी संबंधीत विभागाकडे पाठपुरावा करणे व सर्वोच्च बोलीधारकास आवश्यक तेथे मार्गदर्शन करणे इ.

०२. खाणपट्टाधारकाने विविध परवानग्या/मंजुरीसाठीचे प्रस्ताव/अर्ज संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याकडे/प्रणालीवर सादर करणे तसेच त्यांची सद्य:स्थिती संबंधीत प्राधिकारी आणि

खाणपट्टेधारक यांनी शासनास तसेच महासंचालक, भू. व ख. यांना पाठवावा, याची कार्यपध्दती महासंचालक, भू. व ख.यांनी विहित करावी.

०३. सदर बैठकीस संबंधीत खाणपट्टाधारकास तसेच समितीतील सदस्याव्यतिरिक्त, अन्य विभागाशी संबंध येत असेल तर, त्या विभागाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास बैठकीस आमंत्रित करता येईल. समितीची प्रत्येक १५ दिवसात एक आढावा बैठक आयोजित करण्यात यावी. समितीने उपरोक्त कार्यकक्षेनुसार अ.क्र.१,२ व ३ बाबत आदर्श कार्यान्वयन पध्दती, परवानग्याची प्रणाली व कार्यपध्दती बाबतचा अहवाल शासनास सादर करावा तसेच खाणक्षेत्रासाठी आवश्यक परवानग्या / मंजूरीबाबत आढावा घ्यावा.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०५०९१४१२२४०७६४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

LAXMIKANT GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2025.05.09 14:14:04 +05'30'

**(लक्ष्मीकांत ढोके)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (खनिकर्म), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (खनिकर्म), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (खनिकर्म),उद्यागे, उर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मंबई
६. अपर मुख्य सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीबदल विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, मदत व पुनवर्सन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
११. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,मुंबई
१२. जिल्हाधिकारी (सर्व)
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, वनबल प्रमुख /वन्यजिव/संरक्षण/नोडल ऑफीसर, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
१५. मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक (प्रादेशिक) (सर्व)
१६. प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ (सर्व)
१७. उप प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ (सर्व)

१८. सह जिल्हा निबंधक (वर्ग-१) तथा मृदांक जिल्हाधिकारी (सर्व)
१९.जिल्हा भूमि अभिलेख अधिकारी (सर्व)
२०.अधिक्षक अभियंता (सर्व) जलसंपदा विभाग
२१.जिल्हा मदत व पुनर्वसन अधिकारी (सर्व)
२२.जिल्हा खनिकर्म अधिकारी (सर्व)
२३.निवड नस्ती-उद्योग-९अ